ख्रिस्ती लोक व तुर्क लोक ह्यांच्यामध्यें युरोपाच्या पूर्वभागांत लढाया चालल्याच होत्या. इ० स० १५२६ त तुर्कांच्या सुलतानानें विएना शहराला वेढा घातला, व ब्यूदा शहर घेतलें. तें १५० वर्षें त्याच्या ताब्यांत होतें. १५७१ त त्यानें माल्टा बेटावर हल्ला केला; परंतु आस्त्रियाचा *दान जान ह्यानें लेपांतो बंदर एथें त्याचा पराभव केला. सोळाव्या शतकाच्या अखेरीस कान्स्तांतिनोपल एथील सुलतानी सरकार ह्याचें प्राबल्य कमी होऊं लागलें. इ० स० १६५६ त तें कांहींसें पूर्वस्थितीवर आलें, परंतु त्या सरकाराची वागणूक फार त्रासक असल्यामुळें पुनः नवीन लढाई सुरू झाली, तींत पोलंदचा राजा जान सोबीस्की ह्यानें इ० स० १६८३ त तुर्क लोकांचा विएना एथें मोठा पराभव केला. ब्यूदा शहर त्याच वेळीं परत घेतलें. आणि बेलग्रेद शहर पुढें लवकरच घेतलें. १६९९ त सुलतानी सरकारानें जिंकलेल्या मुलुखांतून पुष्कळ मुलूख सोडून दिला. तुर्क लोकांनीं वेनीस शहर, जर्मनीचें राज्य, व रूस देश ह्यांतील लोकांबरोबर ज्या लढाया केल्या त्या फार असल्यामुळें एथें सांगतां येत नाहींत, व अर्वाचीन राज्यनीतीकडे लक्ष्य लागून हें जुनें वैमनस्य नाहींसें होण्यापूर्वींच अठराव्या शतकाचीं बरींच वर्षें होऊन गेलीं होतीं.

युरोपाच्या पूर्वभागांत लढाया.

विषुववृत्ताच्या दुसऱ्या टोंकास स्पेन देशांत महंमदाचे अनुयायी हे फार दिवस युरोपांतून मागें हटले होते. अकराव्या व बाराव्या शतकांत लेयोन आणि कास्तिल्ला हीं राज्यें, तशींच आरागोन आणि नावारा हीं राज्यें, ह्यांतील लोकांनीं मुसलमानांवर चाल

स्पेनमधून मुसलमान लोकांना घालविलें. इ०स० १४९२

* हा दान जान पांचवा चार्लस जो जर्मनीचा बादशाह ह्याचा कडवा पुत्र होता.

करून जाण्याची सुरवात केली. तेव्हां ते मागें हटून ग्रानादा प्रांतांत गेले, तेथून त्यांना इ० स० १४९२ त पुनः परत न येतील असें हांकून लाविलें. हा जय झाल्यामुळें मुसलमानांनीं कान्स्तांतिनोपल घेतल्याचें नुकसान हें बहुतकरून नाहींसें झालें.

---

## धडा २४.

अर्वाचीन युरोप.

युरोपांतील अर्वाचीन राज्यपद्धतीची सुरवात इ० स० १५०० पासून होते. ही पद्धत पुष्कळ गढून अभ्यास करण्यासारखा विषय आहे. परंतु युरोपांतील राज्यांत ह्या वेळीं पुष्कळ आणि मोठमोठे जरी फेरफार झाले होते, तरी ते एथें सांगतां येत नाहींत. पूर्वीं ज्या लोकांच्या हातीं युरोप देश होता त्याच लोकांच्या हातीं तो राहिला आहे, व त्याचे मुख्य विभागही पहिलें होते तेच आहेत. ह्मणून युरोपांतील राज्यांविषयीं थोडेंसें लिहिल्यावर युरोपांतील आर्य लोक पश्चिम व पूर्व ह्या दिशांकडे पुनः कसकसे पसरत गेले ह्याचें वर्णन करणें आवश्यक आहे.

युरोपांतील संस्थानें.

इसवी सन १५०० च्यापुढें युरोपांतील राज्यांचे दोन भाग करितां येतील; ह्मणजे एक दक्षिणेकडील भाग व दुसरा उत्तरेकडील भाग. दक्षिणेकडील भागांत इंग्लंद, फ्रान्स, स्पेन, आस्त्रिया, जर्मनीचें साम्राज्य, पोपाचा मुलूख, व तुर्की सुलतानांचें राज्य हीं मुख्य राज्यें होतीं, आणि उत्तरेकडील भागांत स्वीदन, देन्मार्क, पोलंद, रूस, व प्रुश्या हीं होतीं.

इंग्लंद. इंग्लिश लोक हे कोण?

इ० स० ४१० त रोमन लोकांनीं इंग्लंद देश सोडून दिल्यावर तेथें राहणाऱ्या केल्त जातीच्या लोकांना *ज्यूतन जातीचे जूत, *आंगल, व *साक्सोन ह्या लोकांनीं पश्चिम कोंपऱ्यांत हाकून लाविलें. हे सर्व लोक

---

* हे देन्मार्क आणि हालंद ह्या देशांतील प्राचीन लोक होत.

युरोपाच्या महाद्वीपांतून आले. आणि कांहीं काळ गेल्यावर ते वेगळीं वेगळीं अनेक राज्यें करून राहिले. तेच पुढें इंग्लिश लोक झाले. पुढें ह्या सर्व राज्यांचें मिळून एक राज्य झालें, व त्याचें नांव पश्चिमेकडील साक्सोन लोकांचें राज्य असें पडलें. हीं सर्व राज्यें मिळून एक राज्य झालें तें चार्लस धि ग्रेत ह्यानें ज्या वेळेस फ्रान्स व जर्मनी ह्यांतील फ्रांक लोकांचें राज्य एक केलें ( इ० स० ८०० ) त्याच वेळेस झालें. त्यानंतर ज्यूत व साक्सोन हे लोक जसे पूर्वीं आले तसेच देन्स ( ह्मणजे उत्तरे-कडचे लोक ) ह्मणून आणखी न्यूतन लोक युरोपाच्या मुख्य भूमींतून ( महाद्वीपांतून ) इंग्लंदांत आले, आणि त्यांनीं इंग्लिशांना दोनशें वर्षेपर्यंत फार पीडा दिली. अखेरीस पुष्कळ देन्स लोक इंग्लंदांत घरेंदारें करून राहिले व इंग्लिश झाले.

देन्स लोकांपैकीं कांहीं लोक ९१२ त पश्चिमेकडील फ्रांक लोकांत आले; त्या वेळीं त्यांचा मुख्य रोलो ऊर्फ रोल्फ हा होता. कार्लिंग वंशांतील राजा जो पारिसचा कौंत होता त्यानें त्यांना कांहीं मुलूख दिला. आणि रुएन हें शहर त्यांच्या राजधानी-करितां दिलें. ते त्या मुलखाला नार्मंदी ह्मणजे उत्तरेकडच्या लोकांचा मुलूख असें ह्मणत. हे देन्स लोक फ्रेंच भाषा बो-लावयास शिकले. रोल्फपासून नार्मंदीचा सहावा ड्यूक हा इंग्लंदांत गेला, आणि त्यानें इंग्लंद व इंग्लिश लोक ह्यांना जिंकिलें ( १०६६ ).

परंतु *नार्मन लोकही इंग्लिशांत मिसळून गेले, आणि ते आजपर्यंत इंग्लिशच आहेत. मागें इंग्लिश राजांकडे वडिलां-पासून आलेल्या वारशाच्या हक्कानें फ्रान्साचा एक मोठा भाग होता; परंतु तो त्यांजकडून गेला ( इ० स० १४५३ ).

---

* नार्मंदी प्रांतांतील लोक.

लोथेयरच्या मध्य (फ्रान्स व जर्मनी ह्यांच्या मधल्या ) राज्याचे (धडा १९ ) तीन भाग केले. एक लोथरिंजिया किंवा लोरेन, हा उत्तरेस होता: दुसरा बर्गंदी ( प्रोविन्स, सावाय,आणि रोइस व जूरा ह्या नद्यांमधील स्वित्सलँद ), हा मध्यें होता ; आणि तिसरा भाग इताली, हा दक्षिणेस होता. हे तिन्ही भाग, निरनिराळ्या वेळीं जर्मन राज्याला जोडले होते ; परंतु पुढें फ्रान्सच्या लोकांनीं लोरेन व बर्गंदी ह्या प्रांतांचा बराच भाग आपणांकडे घेतला. बर्गंदीच्या बाकी राहिलेल्या भागाला हल्लीं स्वित्सलँद म्हणतात. स्वित्सलँदच्या लोकांनीं पंधराव्या शतकांत आपणांस स्वतंत्र करून घेतलें.

लोथेयरच्या मध्यराज्याची वांटणी. फ्रान्सचा कांहीं भाग; स्वित्सलँदचा भाग; व इतालीचा कांहीं भाग.

जर्मन बादशाहाची इतालींतील सत्ता चादाव्या शतकांत नाहींशी झाली. पुढें फ्रान्सचा राजा व जर्मनी एथील बादशाह हे दोघे साम्राज्याचा हक्क सांगूं लागल्यामुळें इताली ही त्यांच्या लढाईची जागा झाली होती. पण शेवटीं जर्मनीच्या पांचवा चार्लस नांवाच्या बादशाहाला पुनः वर्चस्व मिळालें. चार्लस हा स्पेनचाही राजा असल्यामुळें त्याच्या वेळेपासून इतालीचा उत्तरभाग स्पेन देशाखालीं आला. पुढें स्पेन देशांत चार्लसाच्या वंशाची समाप्ति झाल्यावर गादीवर बसण्याविषयीं फ्रान्स व आस्त्रिया ह्या दोन देशांमध्यें तंटा लागला. त्याचा निकाल असा झाला कीं, फ्रान्सांतील एक राजपुत्र स्पेनचें राज्य करण्याकरितां गेला, तों इतक्यांत इतालींतील मुलूख आस्त्रियाकडे गेला. *दक्षिण इतालींतून स्पेनच्या बुर्बोनवंशी

---

* इतालींतील लोकांनीं बंड करून स्पेनच्या बुर्बोनवंशी राजांस दक्षिणइतालींतून इ० स० १८५८ त हाकून दिलें.

राजास हाकून दिलें, तसेंच *आस्त्रियन लोकांनीं उत्तरइताली सो-डून दिली, आणि त्याच्याही अलीकडे †पोपाची राजाप्रमाणें सत्ता चालत होती ती नष्ट झाली. ह्या सर्व गोष्टी हल्लींच्या लोकांच्या नजरेस आल्याच आहेत. आतां इतालीचे सर्व भाग एका राज्याखालीं आलेले दृष्टीस पडतात.

बैजंतियम एथील शेवटच्या ग्रीक लोकांना नार्मन साहसी लोकांनीं इतालीच्या दक्षिणभागांतून हाकून लाविलें. (इ० स० १०६०.)—त्यांनींही सहराजन लोकांना सिसिली बेटांतून हाकून लाविलें, व दोन सिसिलींचें राज्य म्हणून ज्याला तेव्हांपासून म्हणतात त्याची स्थापना केली. लग्नसंबंधामुळें तें राज्य नार्मन लोकांकडून स्वाबियन वंशांतील जर्मन बादशाहांकडे गेलें (इ० स० ११८९). पुढें आंजू घराण्यांतील एका फ्रेंच राजानें तें त्यांच्या वंशांतून घेतलें (इ० स० १२७२). नंतर त्याच्या घराण्यांतून तें आरागोनच्या राजांकडे गेलें. ह्याप्रमाणें तें स्पेन देशाकडे सामील झालें. फ्रान्सांतील राजकीय (बुर्बोन) घराण्यांतील एक पुरुष स्पेनच्या गादीवर बसला, तेव्हां हें दोन सिसिलींचें राज्य त्या घराण्यांतील एका पुरुषाकडे गेलें.

दक्षिण इताली.

इ० स० १७३५.

थोडक्या दिवसांपूर्वी सार्दिनियाचा राजा हा इतालीचा राजा झाला, तेव्हां नेपल्स एथील बुर्बोन वंशांतील पुरुषांना कसें हाकून दिलें, व त्या आलीकडे स्पेनमधल्या बुर्बोन वंशांतील पुरुषांना कसें हाकून लाविलें, हें तुम्हांला स्मरत असेल.

पोर्तुगालच्या कौंतांनीं सहराजन किंवा मूर ह्या लोकांना ११३९ त हाकून देण्यास आरंभ केला. तेव्हांपासून ते आपणां-

---

* सार्दिनियाच्या राजानें फ्रेंच लोकांच्या मदतीनें आस्त्रियन लोकांना उत्तर इतालीतून इ० स० १८६१ त हाकून दिलें.

† पोपाची बादशाही इ० स० १८७० त नष्ट झाली.

स राजे म्हणवूं लागले. मूर लोकांचा पाठलाग करीत करीत ते आफ्रिकेंत गेल्यामुळें त्यांना समुद्रावर मोठमोठीं जोखमीचीं कृत्यें ( इ० स० १४१० पासून पुढें ) करावीं लागलीं.

फार दिवसपर्यंत जर्मन राष्ट्र हें युरोपांतील राज्यांच्या मुख्य स्थानीं होतें. तेथील बादशाह हा स्वतंत्र राजांच्या समूहाचा फक्त मुख्य होता, हें तुम्हांस स्मरत असेल. बाराव्या शतका- पासून निवड करून बादशाह नेमण्याचें काम सात निवडणारे राजे करीत होते. इ० स० १२७३ पासून जर्मन बादशाहा- च्या सत्तेला उतरता पाया लागला. तेव्हां पुढें हाताखालचे राजे व स्वतंत्र शहरें हीं बादशाहाची आज्ञा मानीनातशीं झालीं, व त्यांजकडून तसें करविण्याचा उपाय त्याजवळ राहिला नव्ह- ता. परंतु सर्व राष्ट्र हें जगांतील व्यवस्थेचा एक भाग आहे असें मानीत असत, व जर्मन लोकांना अजून बादशाह ह्या नां- वाची मोठी प्रतिष्ठा वाटे, ह्यामुळें १८०६ पर्यंत नांवाचे बादशाह चालले होते. आलीकडे प्रुश्या देश सर्व जर्मन संस्थानांत श्रेष्ठ होऊन सर्व जर्मन लोकांचें एक बलाढ्य राष्ट्र करण्याविषयीं हल्लीं कसा झटत आहे, व जर्मन लोकांनीं फ्रेंच लोकांचा पराभव के- ल्यावर प्रुश्याच्या राजानें आपणास जर्मनीचा बादशाह हा कि- ताब कसा घेतला, ह्यांविषयीं तुह्मीं सांप्रत कालच्या इतिहासांत वाचिलें असेल.

फ्रान्स देशांत ह्यू कापेत ह्यापासून इ० स० १७९२ त झाले- ल्या राज्यक्रांतीपर्यंत एकाच वंशांतील राजे सतत राज्य करीत होते. त्यानंतर १८१४ पासून १८४८ पर्यंतही पुनः एकाच वंशांतील राजे राज्य करीत होते.

इ० स० १५२७ त आस्त्रियाच्या ड्यूकांपैकीं एकजण हंगारी व बोहीमिया ह्याही प्रांतांचा राजा झाला; तेव्हांपासून हल्लीं ज्याला आस्त्रियाचें साम्राज्य ह्मणतात तें होऊं लागलें.

ज्याच्या योगानें अनेक कलह झाले तें धर्मसंबंधी वर्चस्व सर्व राजांवर असण्याचे हक्क पोपांला असून खेरीज "स्तेत्स आफ दि चर्च" ह्या मुलखावर ऐहिक अधिकाऱ्यांच्या ( राजांच्या ) नात्यानें ते अंमल करीत असें इतिहासावरून दृष्टीस पडतें.

मंगोली लोकांच्या हातांतून सुटल्यावर ( इ० स० १४६२-१५०५ ) स्लावोनी लोकांनीं रूसच्या राज्याची स्थापना केली, आणि तें आशियाच्या उत्तरभागावर वाढविलें ( १५३३-१५८४).

तुम्हांला स्मरत असेल कीं, पोलंद देश हा नकाशांतून नाहींसा झाला आहे, कारण १७७१-७२ व १७९३-९५ ह्यांत रूस व आस्त्रिया आणि प्रुश्या ह्यांनीं तो देश वांटून घेतला.

वेनिस शहरचे व्यापारी ह्यांचें लोकसत्तात्मक राज्य ( आत्तिला राजापुढें टिकाव धरवेना म्हणून आकिलीया शहर सोडून पळून गेलेल्या लोकांनीं स्थापित केलेलें ) तुम्हांला विसरतां कामा नये. सोळाव्या शतकांत ह्या राज्याखालीं मुख्य भूमींतील ( महाद्वीपांतील ) पुष्कळ मुलूख होता. तसेंच नेदर्लंड्स म्हणून जे देश आहेत तेही विसरतां कामा नये. त्यांनीं इ० स० १६४७ त स्पेन देशापासून स्वातंत्र्य जिंकून घेतलें. हे देश लग्नसंबंधामुळें बर्गंदी प्रांताच्या ड्यूकाच्या घराण्यांतून जर्मनीचा बादशाह पांचवा चार्लस ह्याजकडे गेले, व त्याजकडून त्याचा मुलगा स्पेनचा फिलिप ह्याजकडे गेले.

ही गोष्ट लक्ष्यांत ठेवा कीं, वरील संक्षिप्त वर्णन फक्त इतक्याच करितां केलें आहे कीं, तेणेंकरून प्रत्येक अर्वाचीन राज्याला हल्लींचा आकार कसा प्राप्त झाला व त्यांत जे लोक हल्लीं आढळतात ते तेथें कसे आले ह्यांची तुह्मांला सामान्य माहिती व्हावी, ह्मणजे त्यांपैकीं एकादा राज्याच्या अर्वाचीन इतिहासाचा

अभ्यास करण्यास तुम्ही आरंभ कराल तेव्हां त्यांच्या मागील इतिहासाचें अगदींच अज्ञान तुम्हांला असल्यास तितकें राहणार नाहीं.

---

## धडा २५.

इ० स० १५०० पूर्वी थोडया वर्षांपासून युरोपांतील आर्य लोक दुसऱ्या देशांत कसकशा वसाहती करूं लागले हें आतां तुह्मांला समजून घ्यावयाचें आहे. प्रथम पोर्तुगाल व स्पेन ह्या देशांतून मुख्यत्वेंकरून वसाहती करणारे लोक येत होते, आणि नंतर हालंद व इंग्लंद ह्या देशांतून येऊं लागले, ह्मणून भूमध्य-समुद्र सर्व पृथ्वींतील व्यापाराचें मुख्य स्थल होतें तें बदलून युरोपाचे पश्चिम किनारे हें व्यापाराचें मुख्य स्थळ त्या वेळीं झालें.

पोर्तुगाल व स्पेन एथील लोकांच्या सफरी. १४१०–१५३५.

हे वसाहती करणारे व व्यापार चालविणारे लोक दोन दिशांकडे गेले, ह्मणजे कांहीं पश्चिमेस आणि कांहीं पूर्वेस; किंवा स्थूलमानानें पश्चिमेस ह्मणजे अमेरिकेंत गेले, आणि पूर्वेस ह्मणजे हिंदुस्तानांत व त्याच्या पलीकडच्या बेटांत गेले, असें ह्मटलें तरी चालेल.

इ० स० १४९० त अमेरिका खंड आहे हें सुद्धां कोणाला माहीत नव्हतें हें तुह्मांला स्मरत असेल. हिंदुस्तान ह्मणून एक देश आहे असें माहीत होतें खरें, परंतु तेथील लोक, त्यांचे कायदे किंवा रीतीभाती ह्यांविषयीं कांहींएक माहीत नव्हतें.

पोर्तुगीज लोकांनीं मूर लोकांचा पाठलाग करण्याकरितां सफरी करण्यास १४१० त आरंभ केला. त्यांना वाटेंत काय काय नवें सांपडलें तें नकाशावरून काढतां येईल. तें एणेंप्रमाणें, मदीरा बेट १४१९; केप बोजादोर (आफ्रिकेंत) १४३९; केप वर्द (आफ्रिकेंत) १४४६; सेन्त तामस व आन्नोबान बेटें (आ-

फ्रिकेंत) १४७१; केप आफ गुद होप एथें *दियाज हा गेला (१४८६), व वास्को दिगामा ह्यानें त्या केपाला वळसा घातला (१४९८), आणि तोच हिंदुस्तानांत येऊन कालिकोट बंदर एथें उतरला. पोर्तुगीज लोकांच्या वसाहतीच्या मुलखांची गोवें ही मुख्य जागा १५१० त झाली. आफ्रिकेच्या पूर्वकिनाऱ्यावरील मोजांबीक, सोफाला, व मेलिंदा (१५०८) हीं स्थळेंही त्यांच्या ताब्यांत होतीं. तशींच दिव बेट व दमान बंदर (१५३३), कोची प्रांत, व मलबार किनारा, मद्रास किनाऱ्यावरील निगापट्टण शहर, आणि मलाक्का शहर (१५११), व मोलुका बेटें (१५११), हीं त्यांनीं घेतलीं. तेथून ते सुमात्रा, जावा, बोर्निओ, इराणी आखातांत मस्कत बंदर व होर्मज बेट (१५१५), आणि सिंहलद्वीप एथें गेले. त्यांनीं सिंहलद्वीपांत दालचिनीचा व्यापार दुसऱ्या कोणाला करूं न देतां तो आपणांकडेच ठेविला होता (१५१८). आतां पश्चिम गोलार्धाच्या नकाशाकडे पहा. बहामा बेटांपैकीं सेन्त साल्वादोर हें बेट कोलंबसाला १४९२ त सांपडलें. नंतर त्यानें तीन सफरी केल्या त्यांत त्याला दुसरीं बेटें व मुख्य भूमीचा (महाद्वीपाचा) कांहीं भाग हीं सांपडलीं. हिस्पानिओला, क्यूबा, जमेका, ह्या बेटांत १५०८–१५१० त वसाहती केल्या. स्पानिश लोकांनीं तेथील लोकांना जुलमानें हिस्पानिओलाच्या खाणींत काम करायाला लाविलें, आणि दास करून टाकिलें. ह्या दासत्वापासून मुटका होण्याची आशा तेथील लोकांस नव्हती. विल्बोआ हा १५१३ त †दिरिएनच्या संयोगी भूमीस पोहोंचला, आणि त्यानें त्याच्या खडकाळ मध्यावर उभें राहून खालीं पासिफिक महासागर पाहिला. लास कासस नांवाच्या एका स्पानिश

---

* हा पोर्तुगीज लोकांच्या आरमाराचा मुख्य होता.

† ही संयोगी भूमि दक्षिणअमेरिकेंतील न्यू ग्रानादा देशांत आहे. हिला पानामा हेंही नांव आहे.

सद्गृहस्थानें तद्देशीय लोकांवर जुलूम न होण्याविषयीं प्रयत्न केला परंतु दुर्दैवानें अशी गोष्ट घडली कीं आफ्रिकेंतून नीग्रो लोक त्या देशांत न्यावे हा त्यांच्या दुःखनिवारणार्थ त्यानें उपाय योजिला, त्यामुळें आफ्रिकेंतील गुलामांचा व्यापार मात्र सुरू झाला. ह्या स्पेन देशांतील वसाहती करणाऱ्या लोकांचा उद्देश मेक्सिकोच्या आखातांतील बेटांत सोनें आणि रुपें शोधून काढावें ह्याशिवाय दुसरा नव्हता.

---

## धडा २६.

इ० स० १५१९ पासून १५३६ पर्यंत स्पानिश लोकांनीं अमेरिका खंडांत चार प्रांतांचें एक मोठें राज्य स्थापिलें. ते प्रांत मेक्सिको, पेरू, दक्षिणअमेरिकेच्या उत्तर भागांतील तेराफर्मा, आणि न्यू ग्रानादा हे होते. स्पेनमध्यें ह्या वसाहतींवर राजा एका मंत्रिसभेच्या साहाय्यानें अंमल चालवी,

स्पानिश लोकांचें अमेरिकेंतील वसाहतींचें राज्य. १५१९-१८२५.

आणि मेक्सिकोमध्यें एक व पेरूमध्यें एक असे दोन राजप्रतिनिधि असत ते अमेरिकेंत अंमल चालवीत. ह्या प्रत्येक प्रतिनिधीला साहाय्य करण्याकरितां एकेक मंत्रिसभा असे. मेक्सिको एथें एक व लिमा (१५४२) एथें एक अशीं दोन हे कोर्तें होतीं, ह्यांनीं केलेल्या ठरावावर इंदीजचा राज्यकारभार पाहणाऱ्या सभस अपील होत असे. एथील लोकांनीं ख्रिस्ती धर्म स्वीकारिला होता; धर्मसंबंधी काम करण्याकरितां धर्मोपदेशकांची नेमणूक केली होती, व मठांची स्थापना केली होती. अमेरिकेंतील जुने विद्याचार व तेथील लोकांचा स्वराष्ट्राभिमान हीं नष्ट करून टाकिलीं होतीं. तेथील लोकांना गुलाम करून त्यांचे धनी स्पानिश लोक ह्यांच्या हाताखालीं त्यांच्या जमिनींत त्यांना खपायास लाविलें होतें. देशाचा व्यापार सगळा तीन बंदरीं

होत होता, ह्मणजे स्पेनमध्यें सेविल्ल बंदरीं, मेक्सिकोंत वेराक्रूथ बंदरीं, आणि दक्षिणअमेरिकेंत पोर्तोबेलो बंदरीं. ह्या वसाहतींस लागणारे जिन्नस घेऊन जाऊन त्यांबदला त्यांच्या खाणींतून मौल्यवान धातु आणण्याकरितां प्रतिवर्षीं तारवांचे दोन ताफे सेविल्ल बंदराहून रवाना होत असत. पेरूमधील स्पानिश लोकांनीं हळूहळू चिली प्रांत जिंकून घेतला.

पोर्तुगीज लोकांनीं ब्राझिलमध्यें ज्या वसहती केल्या (१५९१-१५५० ) त्यांत तेथल्या मूळच्या लोकांच्या संबंधानें पाहिलें असतां स्पानिश लोकांचीच पद्धत त्यांनीं सुरू केली होती. सेन्त साल्वादोर ही त्यांच्या वसाहतींची राजधानी होती. परंतु अठराव्या शतकाच्या आरंभापर्यंत पेरूमधील सोन्याच्या खाणी व हिरे सांपडले नव्हते.

अंमल चालविण्याच्या पद्धतींत फेरफार झाल्यानें १८ व्या शतकांत मेक्सिकोंत राहणाऱ्या लोकांची स्थिति बरी झाली, व खाणींत काम करण्याविषयीं लोकांवर बलात्कार करण्याची चाल होती ती बंद झाली. ब्राझिलमध्यें पोर्तुगीज लोक परक्यांना येऊं देत नसत, त्यामुळें सुमारें दोन शतकेंपर्यंत त्या सुंदर देशाची माहिती नव्हती, आणि असली तरी फारच थोडी असेल.

आतां ह्या वसाहतींचा पुढील इतिहास एथें सांगितला असतां बरें आहे म्हणून तो सांगतों.

अठराव्या शतकाच्या अखेरीस फ्रान्स देशांत मोठी राज्यक्रांति झाली. तिच्या समाप्तीच्या सुमारास फ्रान्साचा जो हल्लीं नुकता बादशाह होता त्याचा चुलता नापोलियन बोनापार्त हा आपण फ्रेंच लोकांचा बादशाह झाला, आणि युरोपांतील दुसऱ्या राजांच्या गाद्यांवर आपल्या संबंध्यांना बसवूं लागला, हें तुम्हांस माहीत असेल. तेव्हां त्यानें पुष्कळ राजांना हाकून लाविलें. त्यांत

स्पेनच्या बुर्बोनवंशी राजालाही त्यानें इ० स० १८०८ त हाकून लाविलें. त्या वेळीं मेक्सिको व दक्षिणअमेरिका ह्यांतील स्पेन देशाच्या वसाहतींतील लोकांची प्रथम आपल्या राजाच्या ताब्यांत राहण्याची इच्छा होती; परंतु राजाच्या पक्षाच्या लोकांनीं ( स्वतंत्रतेचे जे हक्क वसाहतवाले मागत होते त्यांतून एकही कबूल न केल्यानें ) वेडेपण केलें, त्यामुळें त्या लोकांना प्रजासत्ताक राज्यें करून स्पेन देशाचा संबंध तोडून टाकणें भाग पडलें. जीं ह्या वेळीं प्रजासताक राज्यें झालीं तीं एणेंप्रमाणें:—मेक्सिको (१८२९ ); ग्वातिमाला ( १८२१ ); कोलंबिया ( न्यू ग्रानादा ), कितो किंवा एक्वादोर, आणि वेनिझूएला किंवा काराकास (हीं तिन्हीं मिळून कोलंबियाचें एक प्रजासत्ताक राज्य झालें होतें ); बोलिविया ह्मणजे वरचा पेरू देश; ज्यानें कोलंबिया देशाची दास्यापासून मुक्तता केली ( १८२५ ) त्या सिमोन बोलिवर नांवाच्या शूर पुरुषाच्या नांवावरून हें नांव वरच्या पेरू देशाला पडलें आहे ; चिली (१८१८); पेरू (१८२४–६) ; रियो दि ला प्लाता अथवा ब्यूएनोस ऐरेस, ह्याला हल्लीं आर्जेन्तैन कानफेदरेशन म्हणतात; पाराग्वे; आणि युराग्वे किंवा बांदा ओरियंतल, हा पूर्वीं ब्राझिल देशांमधील एक प्रांत होता (१८२८ ).

पोर्तुगीज लोकांकडे जो ब्राझिल देश होता त्यांत काय काय झालें तें तुम्हांस सांगावयाचें राहिलें आहे, तें आतां तुम्हांस सांगतों. पोर्तुगाल देशांतील राजकीय घराण्यालाही नापोलियन ह्यानें हाकून लाविलें. तेव्हां ते ब्राझिलमध्यें गेले (१८०८); तेथें १८२० पर्यंत त्यांचें राज्य होतें. पोर्तुगाल देश फ्रेंच लोकांच्या अमलाखालीं गेला तेव्हां परकी राष्ट्रांना ब्राझिल देशाबरोबर व्यापार करण्याची मोकळीक झाली, व पोर्तुगालच्या मृत राजाच्या राणीचा मुलगा दान जान ह्यानें राजव्यवस्थेंत पुष्कळ सुधारणुका केल्या. दान जान हा पोर्तुगालचा राजा होण्याकरितां परत

पोर्तुगालमध्यें गेला, आणि ब्राझिलमध्यें राज्य करण्याकरितां त्यानें आपला मुलगा दान पेद्रो ह्याला मागें ठेविलें. परंतु सर्व लोकांची स्वतंत्र होण्याची इच्छा होती, त्यामुळें ब्राझिलमधील लोक पोर्तुगाल देशाच्या अमलाखालीं पुनः येण्यास कबूल होत ना. आम्ही स्वतंत्र आहों, असें साफ सांगून त्यांनीं राज्यव्यवस्था पहाण्याकरितां बादशाहाच्या हाताखालीं मंडळी नेमिली, आणि तिच्या अनुमतें बादशाहानें राज्यकारभार चालवावा, असा ठराव करून दान पेद्रो ह्याला बादशाह केलें ( १८२२ ). अजूनही त्याच्याच घराण्याचा अंमल ब्राझिलमध्यें आहे. आतां दक्षिण अमेरिकेचा नकाशा घेऊन तुम्हीं लक्ष्यपूर्वक पाहिला, तर हें समजण्यास तुम्हांला अडचण पडणार नाहीं.

---

## धडा ३७.

उत्तरअमेरिका
१५७०-१८६१.

आतां उत्तरअमेरिकेच्या नकाशाकडे वळा, आणि मेक्सिकोच्या उत्तरेस कोणते आर्य लोक जाऊन राहिले तें ऐका. एथेंही इतर देशांप्रमाणें मूळचे रहाणारे म्हणून कांहीं लोक होतेच. त्यांजपासून नवीन जाऊन रहाणाऱ्या लोकांनीं त्यांचा देश काढून घेतला.

सफरी करणारे इंग्लिश लोक ह्या लोकांकडे सोळाव्या शतकांत आले. ते दोन ठिकाणीं राहिले. कांहीं व्हार्जिनिया प्रांतांत ( १५७८ व १६०७ ) राहून तंबाकू पिकवूं लागले. पुढें त्यांनीं दच लोकांचें गलबत नीग्रो लोक घेऊन आलेलें पाहिलें त्यावरून त्यांना गुलामांकडून काम करविण्याची वाईट सवय लागली (१६१९). आणि प्यूरितन पंथाचे कांहीं इंग्लिश लोक इंग्लंदांतील धर्मसंबंधी व्यवस्था त्यांस न आवडल्यामुळें इंग्लंद देश सोडून व्हार्जिनिया संस्थानाच्या उत्तरेस मासाचूसेत्स संस्थानांत

जाऊन राहिले (१६२०). पुढें लवकरच फ्रान्सांतून वसाहती करणारे लोक आले. ते इंग्लिशांच्या उत्तरेस कानदा व आकादिया ह्या प्रांतांमध्यें (१६०८) आणि दक्षिणेस लुइसियाना ह्या प्रांतामध्यें (१६८६) राहिले. फ्रान्स व इंग्लंद ह्यांच्यामध्यें परस्परांशीं होणाऱ्या लढायांचा परिणाम त्यांच्या वसाहतींतील लोकांना भोगावा लागला. युत्रेक्त शहर एथें तह होऊन (१७१३) फ्रेंच लोकांनीं नोवा स्कोशिया प्रांत व न्यूफौंदलांद बेट हीं इंग्लिशांस दिलीं. इंग्लिशांनीं किबेक शहर घेतल्यावर (१७६३) त्यांना फ्रेंचांनीं कानदा प्रांत दिला. हा वेळपर्यंत अमेरिकेंतील वसाहतींतले लोक आपल्या मूळच्या देशाशीं फार सख्यानें वागत होते. परंतु पुढें कराच्या संबंधानें तंटे उद्भवल्यामुळें इ० स० १७७५ त इंग्लिश व त्यांच्या वसाहतींतील लोक यांच्यामध्यें लढाई उपस्थित झाली. इ० स० १७७६ त तेरा युनैतेद स्तेत्स (ज्यांची एकी झाली आहे अशीं संस्थानें) ह्यांनीं आपण स्वतंत्र आहों असें प्रगट केलें. पुढें त्यांची व इंग्लिशांची कांहीं दिवस लढाई चालली होती, पण तींत इंग्लिशांना जय मिळाला नाहीं. त्यामुळें युनैतेद स्तेत्सचें स्वातंत्र्य त्यांस इ० स० १७८२ त मान्य करावें लागलें. इंग्लंदानें कानदा व नोवा स्कोशिया हे प्रांत आपणाकडे ठेविले. बाकी राहिलेली लुइसियाना नांवाची फ्रेंच लोकांची वसाहत युनैतेद स्तेत्स ह्यांनीं १८०३ त विकत घेतली, व स्पेनपासून *दोन्ही फ्लोरिदा द्वीपकल्पें १८२० त विकत घेतलीं. त्यानंतर †तेक्सास प्रांत हा मेक्सिको देशाला सोडून देऊन युनैतेद स्तेत्स ह्यांना मिळाला. मेक्सिकोनें तह करण्याकरितां कालिफोर्निया देश सुद्धां दिला होता. अखेर इ० स० १८६७ त अमेरिकन लोकांनीं अमेरिका खंडाच्या वायव्य

---

* पूर्व फ्लोरिदा आणि पश्चिम फ्लोरिदा.

† तेक्सास प्रांत उत्तरअमेरिकेंत मिसिसिपी नदीच्या पश्चिमेस आहे.

कोंपऱ्यास रूस लोकांची अमेरिका म्हणून अफाट मुलुख होता तो रूस देशापासून विकत घेतला. हल्लीं एकंदर ३४ स्तेत्स* व ८ तेरितोरी आहेत. इ० स० १८६१ त उत्तरेकडील स्तेत्स ह्यांनीं दक्षिणेकडील स्तेत्स ह्यांशीं लढाई कशी आरंभिली, व तिच्यामुळें हिंदुस्तानांतील कापसाचा व्यापार कोणत्या स्थितीस येऊन पोहोंचला, हें तुह्मांला आठवत असेल.

---

## धडा २८.

पोर्तुगीज लोक हिंदुस्तानांत एक एक पाऊल पुढें टाकीत कसे आले, व हिंदी सागरांत त्यांनीं कोठें कोठें वसाहती केल्या, हें तुह्मांला मागें (२५ व्या धडयांत) समजलेंच आहे. अरबस्तान व मिसर देश ह्यांचे व्यापाराचे जिन्नस ते मस्कत बंदरीं जमवीत, व आशियांतील जिन्नस होर्मज बेटांत जमवीत.

हिंदुस्तानांत पोर्तुगीज लोकांचा ऱ्हास. दच व इंग्लिश ह्यांचा उदय. १५८०—१६५०.

होर्मज बेटांतली जमीन नापीक होती; परंतु त्यांनीं ऐषआरामाचे जिन्नस व संपत्ति ह्यांची तेथें पेठ बनविली. ते हिंदुस्तानांतून लिस्बोन शहरास मिऱ्यें व दुसरे मसाल्याचे जिन्नस, तसाच कापूस, रेशमी कापड, आणि मोत्यें हे जिन्नस पाठवीत, व हे जिन्नस पोर्तुगीज लोकांकडून विकत घेण्याकरितां युरोपांतील दुसरे देश आपलीं गलबतें लिस्बोन शहरास पाठवीत. इ० स० १५१५ त त्यांनीं चीन देशाशीं संबंध ठेवण्याचा प्रयत्न केला. त्यांना १५८५ त चिनांतलें माकाओ बंदर मिळालें, व त्यापूर्वी ते जपान बेटांशीं व्यापार करीत असत. १५५० पासून १६०० पर्यंत पोर्तुगीज लोकांचें हिंदी सागरांत फार प्राबल्य होतें असें समजा.

---

* स्तेत पदवी प्राप्त होण्यास अमुक लोकसंख्या पाहिजे व आणखी कांहीं गोष्टी पाहिजेत असा नियम आहे. तितकें नाहीं तर तेरितोरी हें नांव असतें. तितकी योग्यता झाली ह्मणजे तेरितोरीचें स्तेत होतें.

परंतु ह्या कालाच्या शेवटाच्या सुमारास युरोपांतलि दुसरे दोन लोक हिंदी सागरांत आले. ते कोणते ह्मणाल तर इंग्लिश लोक व दच ह्मणजे स्वतंत्र होण्याकरितां स्पेनबरोबर लढाई चालविणाऱ्या नेदर्लंदांतील कांहीं प्रांतांचे लोक, हे होते.

अशी गोष्ट घडून आली कीं १५८० पासून कांहीं कालपर्यंत स्पेनचा राजा हा पोर्तुगालचाही राजा होता. त्यानें दच लोकांस त्रास द्यावा ह्या हेतूनें १५९४ त त्यांना हिंदुस्तानांतील जिन्नस नेण्यास लिस्बोन शहरीं येण्याची बंदी केली ह्यामुळें खलाशी कामांत कुशल होत जाणाऱ्या दच लोकांना ते जिन्नस आपणांकरितां हिंदुस्तानांत जाऊन आणणें भाग पडलें. त्यामुळें १६०२ त त्यांनीं दच ईस्त इंदिया कंपनी ह्या नांवाची एक मंडळी स्थापिली, व मोलूका बेटांमध्यें वसाहती केल्या; त्यांत जावा बेट ही मुख्य वसाहत केली (१६१८). आंबोयना, बांडा, व तैदार ह्या बेटांतही त्यांनीं वसाहती केल्या, आणि जपान बेटांशीं व्यापार सुरू केला. नंतर त्यांनीं मलबार किनारा व कारोमांडेल किनारा ह्यांवरील पोर्तुगीज लोकांच्या वसाहती घेतल्या. इ० स० १६४० त त्यांनीं मलाका शहर जिंकून घेतलें, व सिंहलद्वीपही त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतलें. पूर्वदेशीं जाण्याकरितां निघालेल्या त्यांच्या गलबतांना कांहीं वेळ उतरण्यासाठीं जागा असावी ह्मणून त्यांनीं केप आफ गुद होप एथेंही एक वसाहत केली. त्यांचे हिंदी सागरांत पांच ठिकाणीं सुभे होते, ह्मणजे जावा, आंबोयना, तर्नैती, सिंहलद्वीप, व मकासर. आणि केप आफ गुद होप एथें नवी वसाहत झाली तेव्हां तो सहावा सुभा झाला.

उत्तरेस व पूर्वेस गलबतें चालवून युरोप व आशिया ह्यांच्या उत्तरभागास प्रदक्षिणा घालून हिंदुस्तानांत जाण्याचा मार्ग शोधून काढण्याचा प्रयत्न इंग्लिश लोक करूं लागले. तेव्हांपासून

सफर करण्याचा त्यांचा क्रम सुरू झाला (इ० स० १५५३). हिंदुस्तानांत येण्याचा मार्ग तर त्यांना सांपडला नाहीं, परंतु त्यांपैकीं कांहींजण गलबतांत बसून गेले ते ओबी नदींत गेले, आणि पुढें रूस देशांतील कांहीं व्यापाऱ्यांबरोबर आस्त्राखान शहर व कास्पियन समुद्र ह्यांजवरून इराण देशांत गेले. नंतर रूसदेश, आफ्रिकाखंड, व लिवांतकिनारा ह्यांच्याबरोबर व्यापार करण्याकरितां मंडळ्या झाल्या. पाहिल्या इंग्लिश ईस्त इंदिया कंपनीला इ० स० १६०० त डिसेंबर महिन्याच्या ३१ व्या तारखेस सनद मिळाली. सुमात्रा व जावा ह्या बेटांकडे पहिली सफर इ० स० १६०१ त झाली. परंतु त्या ठिकाणीं दच लोक प्रबल होते. जे इंग्लिश लोक आंबोयना बेटांत होते त्यांची त्यांनीं इ० स० १६२३ त कत्तल उडविली, व दुसऱ्या मसाल्याच्या बेटांत जे होते त्यांना तेथून हाकून लाविलें. परंतु इराण देशाशीं व्यापार करण्याकरितां इंग्लिशांची वखार सुरत एथें इ० स० १६१२ पासून होती. इ० स० १६२२ त हे होर्मज बेटांतून पोर्तुगीज लोकांना हाकून देण्यासाठीं इराणी लोकांना सामील झाले. इ० स० १६४० त ते कर्नाटकांत राहिले, व मद्रास एथें त्यांनीं फोर्त जार्ज नांवाचा किल्ला बांधिला.

---

## धडा २९.

इ० स० १६६४ त एक फ्रेंच ईस्त इंदिया कंपनी स्थापित झाली, आणि तिनें मादागास्कर बेटांत (१६६५) व सुरतेस (१६७५) वखारी घातल्या. इ० स० १६७९ त त्यांनीं पोंदेशरी शहराची स्थापना केली. परंतु ह्या वसाहती भरभराटीस आल्या नाहींत. इ० स० १६९० त ते ऐल आफ फ्रान्स एथें राहिले, व १७२० त ऐल

युरोपियन लोक पूर्वेकडील देशांत जातात. इ० स० १६६०-१८००.

आफ बुर्बोन एथें राहिले. हीं दोन्ही बेटें दच लोकांनीं सोडून दिलीं होतीं.

दच लोकांनीं केप आफ गुद होप एथें वसाहत केली तेव्हां सेन्त हेलीना बेट त्यांनीं सोडून दिलें होतें, तें इ० स० १६६१ त इंग्लिश लोकांनीं घेतलें. *राणीचें स्त्रीधन म्हणून मुंबई बेट इ० स० १६६१ त मिळालें तें इंग्लंदच्या राजानें १६६८ त कंपनीला दिलें. इ० स० १६८७ त मुंबई व मद्रास हे दोन इलाखे झाले. सुमात्रा बेटांत बेनकुलेन बंदर एथें एक व कलकत्ता एथें एक अशा दोन वखारी त्यांनीं घातल्या, व कलकत्त्याजवळची जमीन विकत घेऊन तेथें एक किल्ला बांधिला. इ० स० १६७० पासून हिंदुस्तानांतील मलमलीचें कापड व रेशमी कापड इंग्लंदास फार जाऊं लागल्यामुळें इंग्लंदांतील कारखानेवाले व लिवांताकिनाऱ्यावरचे व्यापारी ह्यांना आपला व्यापार बुडाला असें वाटून फार राग आला. हिंदुस्तानांत फ्रेंच व इंग्लिश ह्यांचा परस्पर कलह इ० स० १७४६ पासून चालला होता तो हिंदुस्तानच्या इतिहासाचा भाग आहे, म्हणून एथें सांगितला नाहीं.

इ० स० १७४०-१८०० ह्या काळांत दच वसाहतींना उतरती कळा लागली. ह्या काळाच्या अखेरीस दच लोकांची इंग्लिशांबरोबर युरोपांत कांहीं दिवस लढाई चालली होती. जावा बेटांत इ० स० १७४० त दच लोकांनीं निर्दय होऊन चिनी लोकांची कत्तल उडविल्यामुळें सर्व लोक त्यांचा द्वेष करूं लागले. हिंदुस्तानाच्या किनाऱ्यावरचा व्यापार व इराण आणि अरबस्तान ह्या देशांचा व्यापार त्यांजकडे होता तो त्यांज-

---

* पोर्तुगालचा राजा चौथा जान ह्यानें आपली मुलगी काथरैन ही इग्लंदचा राजा दुसरा चार्लस ह्यास इ. स. १६६१ त दिली, त्या वेळीं त्यानें मुंबई बेट तिला आंदण दिलें.

कडून इंग्लिशांनीं घेतला. सिंहलद्वीप, मलाका शहर, व मलबार किनाऱ्यावरच्या वसाहती इंग्लिशांनीं इ० स० १७९५ त घेतल्या. त्याच वर्षीं त्यांनीं केप आफ गुद होप घेतलें, व मोलूका बेटें इ० स० १७९६ त घेतलीं. दच कंपनीचें दिवाळें निघाल्यामुळें ह्या वसाहती सरकारच्या झाल्या. इंग्लिशांनीं जावा बेट इ० स० १८११ त घेतलें, परंतु १८१६ त परत दिलें. तें अजूनही हालंदर लोकांकडे आहे. त्यांत ते अंमल कसा चालवितात ह्याविषयींचा शोध करण्यांत तुम्हीं काळ खर्चिला असतां तो फुकट जाणार नाहीं.

हिंदुस्तानच्या द्वीपकल्पांत दच लोकांच्या सत्तेचा मुलूख वगैरे कांहीं हल्लीं राहिलें नाहीं, तरी सुरतेस दचबंदर म्हणून एक बंदर आहे. व सुरत आणि अमदाबाद ह्या ठिकाणीं दच लोकांच्या कबरा आहेत, त्यामुळें त्यांचें नांव ह्या देशांत राहिलें आहे.

फ्रेंचांकडे कांहीं शहरें अजून राहिलीं आहेत. पोंदेशरी एथें यांचें एक लहानसें संस्थान आहे त्याचें क्षेत्रफळ १०७ चौरस मैल आहे. ह्याखेरीज मद्रासकिनाऱ्यावर कारिकल, मलबार किनाऱ्यावर माही, गोदावरीच्या मुखाजवळ यानान, व कलकत्त्याजवळ चंद्रनगर ह्या त्यांच्या वसाहती आहेत. सुरतेच्या तटाबाहेर एक शेत अजूनही त्यांजकडे आहे हें तुह्मांपैकीं कांहीं जणांस माहीत असेल.

---

## धडा ३०.

वेस्त इंदीज व आस्त्रालिया ह्या ठिकाणीं युरोपियन जातात.

पूर्वेकडे व पश्चिमेकडे वर सांगितलेल्या वसाहतींखेरीज दुसऱ्या वसाहती आहेत, पण त्यांचीं नांवें अजून सांगितलीं नाहींत. वेस्त इंदीज किंवा आंतिलीज म्हणून एक बेटांचा मोठा वेढा आहे तो तुम्हांला माहीत आहेच. तो मेक्सि-

कोच्या आखातापासून दक्षिण अमेरिकेच्या किनाऱ्यापर्यंत पसरला आहे. त्यूतन लोकांच्या व रोमान्स लोकांच्या राष्ट्रांनीं वसाहतींच्या संबंधानें केलेल्या अचाट कृत्यांविषयीं व कलहांविषयीं जें तुम्हीं वाचिलें आहे, त्यावरून ह्या बेटांपैकीं पुष्कळ बेटें ब्रितिशांकडे कां आहेत, आणि फ्रेंच, स्पानियर्द, हालंदर, स्वीद व देन ह्या लोकांकडे थोडीं कां आहेत, तशींच युनैतेद स्तेत्समधल्या अमेरिकन लोकांकडे थोडीं कां आहेत, हें समजण्यास सुलभ पडेल.

हिंदी महासागर आणि पासिफिक महासागर ह्यांच्यामध्यें इंग्लिशांच्या आणखीही वसाहती आहेत. त्या वरील वसाहतींपेक्षां अलीकडच्या आहेत. इ० स० १७८८ त आस्त्रालिया देशांतील न्यू सौथ वेल्स मांतीं सिदनीकोव एथें एक वसाहत स्थापिली होती. तिजपासून वसाहतींचे दुसरे इलाखे झाले. तास्मान्या बेट व न्यू जीलंद बेटें ह्यांचा कप्तान कुक ह्यानें शोध लाविला (१७६९). तास्मान्या एथें सन १८०३ त पहिल्या प्रथम वसाहत झाली. इंग्लिश लोकांनीं गुन्हेगार ठरलेल्या अपराध्यांला काळ्या पाण्यावर ह्मणून पाठवून देण्याच्या उपयोगाला ह्या वसाहती प्रथम लाविल्या होत्या. परंतु त्या पुढें मोठ्या झाल्या आणि सुधारल्या तेव्हांपासून ती चाल बंद केली.

मागील इतिहासाचा उपसंहार.

अगदीं प्राचीन काळापासून आजपर्यंत झालेलीं राष्ट्रांचीं स्थलांतरें तुह्मीं (एकाद्या उंच स्थळावरून पहावें त्याप्रमाणें)आतां पाहिलीं. प्राचीन लोकांचा मागमूस आतां थोडाच राहिला आहे. त्याचीही सामान्य माहिती तुह्मांला आतां झाली आहे; परंतु ती दूर व धुक्यांतून पाहिलेल्या वस्तूसारखी अस्पष्ट आहे. जरी आपणापाशीं इतिहास नाहीं तरी, हिंदुस्तानांतले लोक व युरोपांतले लोक हे जींत सारखेच मोडतात ती मनुष्यांची मोठी शाखा आशियाच्या मध्यभागांतील आपलें ठिकाण सोडून हिंदुस्तान,

इराण, व पश्चिमेकडील देश ह्यांत पसरली असें भाषांच्या सारखेपणावरून खात्रीनें कसें अनुमान करतां येतें, हेंही तुह्मांला समजलें आहे. कांहीं काळपर्यंत आर्य लोक कोठें दिसत नव्हते तरी शिलालेख, नाणीं व युफ्रातिस आणि नील ह्या नद्यांच्या थडयांतील शमी लोकांच्या इमारती ह्यांपासून अधिक भरंवसा ठेवण्यासारखी माहिती इतिहासाला कशी मिळते, हेंही तुह्मांला समजलें आहे. युरोपांतील सर्वांत दूरचीं द्वीपकल्पें हस्तगत होत तोंपर्यंत आर्यलोक पश्चिमेकडेच एकसारखे कसे जात होते: घडलेल्या गोष्टी ज्यांत लिहून ठेविल्या असतात अशीं पुस्तकें म्हणजे इतिहास हे ग्रीस व रोम ह्या देशांचेच प्रथमतः कसे वाचावयास सांपडतात; ग्रीस व रोम ह्यांपैकीं प्रत्येकानें पाळीपाळीनें इतिहासाचें सूत्र आपल्या हातीं कसें घेतलें; कांहीं काळपर्यंत रोम शहरानें सर्व जगाचा इतिहास आपल्या एकटयाच्या इतिहासांत कसा आणिला, व पुनः ट्यूतन लोकांच्या संबंधानें त्याला पुष्कळ फांटे कसे फुटले, स्वातंत्र्य व व्यापार ह्यांच्या वृद्धीच्या योगानें समुद्रावर मोठमोठीं अचाट कृत्यें करून हे ट्यूतन लोक पृथ्वीवर तो काळपर्यंत जीं रानटी स्थळें होतीं तेथें कसे पसरले, व अमेरिका आणि आस्त्रालिया ह्या देशांत मूळचे रहाणारे लोक होते त्यांना हाकून देऊन त्यांच्या जागीं आपण कसे बसले; व वर्चस्व मिळविण्याकरितां आपसांत कलह करीत असतां ह्यांनीं हिंदुस्तानांतील राज्यकारभाराच्या गोष्टींत पडून आश्रय कसा मिळविला; त्या कलहांत इंग्लिशांना जय मिळाल्यावर आपलें स्वास्थ्य रहाण्यास शेजारच्या राजांकडून स्वस्थता ठेवविण्याची आवश्यकता त्यांना कशी दिसून आली; व हा हेतु सिद्धीस नेत असतां कांहीं बिनतोड गोष्टी घडून आल्या त्यांत ते हिंदुस्तानच्या द्वीपकल्पांत पूर्ण वर्चस्व कसे पावले; ह्या सर्व गोष्टी तुह्मांला समजल्या आहेत.

---

लेलें मोठें मैदान आहे तें. एक ढीग एपतिस शहराज-
वळ आहे आणि दुसरा कार्थेज शहराजवळ आहे.

**सिलिसी.**–( सिलिसिया ) आशियामैनरचा समुद्रकिनाऱ्यावरचा एक प्रांत होता. हा सैप्रसच्या उत्तरेस, टौरसच्या दक्षिणेस, आणि युफ्रातिसच्या पश्चिमेस होता.

**सिली बेटें.**–हीं इंग्लंदच्या पश्चिम भागाच्या अगदीं शेवटापासून सुमारें तीस मैलांवर आहेत.

**सिसाल्पैनगाल.**–हा फ्रान्स देशाचा भाग होता. ह्याचा विस्तार इतालीच्या बाजूनें आल्प्स पहाडापासून तों रूबिकन नदीपर्यंत होता. सिस म्हणजे ह्या बाजूस, आल्पैन म्हणजे आल्प्स पहाडाच्या आणि गाल म्हणजें फ्रान्स हे तीन लातिन शब्द मिळून हा एक शब्द झाला आहे. ह्याचा अर्थ आल्प्स पहाडाच्या ह्या बाजूचा (रोम शहराच्या बाजूचा) फ्रान्स देश असा होतो. "ह्या बाजूचा" हें रोम शहरच्या संबंधानें ह्मणणें आहे.

**सिहून**—( जाक्सार्तिस ) ही नदी स्वतंत्र तार्तरी देशांत कोकान प्रांताच्या सुमारें मध्यभागांतून वहात जाऊन उराल समुद्राला मिळते. हिला सिर किंवा सिरदर्या असेंही नांव आहे.

**सूरदेश**—आशियांतील तुर्कस्तानांत युफ्रातिस नदीच्या नैर्ऋत्य दिशेकडचा प्रांत.

**सेल्यूकस.**–सूरदेशचा राजा होता.

**सोफाला.**–पूर्वेकडील आफ्रिकेंतला पोर्तुगीज लोकांच्या अमलांतला प्रांत आहे.

**स्कांदिनेवी.**–(स्कांदिनेविया). नार्वे, स्वीदन, देन्मार्क, लापलंद, पोलंद, वगैरे जे हल्लींचे देश आहेत त्यांस हें प्राचीन नांव होतें.

**आत्तिला.**–हूण लोकांचा राजा होता.

**आथेन्स.**–ग्रीस देशांतील आतिका प्रांताचें मुख्य शहर.

**आमासिस.**—हा पहिल्यानें बाबुलोनच्या राजाच्या एका पलटणींत यःकश्चित शिपाई होता. तो पुढें मिसर देशाचा राजा झाला.

**आर्केदी.**–(आर्केदिआ). ग्रीस देशाच्या दक्षिणेस पेलापोनीससमध्यें हा प्रांत होता.

**ओलिंपियद.**–ग्रीक लोकांमध्यें दर पांचव्या वर्षीं कांहीं खेळ खेळत असत त्यांस आलिंपिक गेम्स (खेळ) म्हणत. त्यावरून ४ वर्षांच्या कालास हें नांव पडलें आहे. वर्षांची गणना ते ह्यावरूनच करीत असत.

**आस्त्रोगाथ.**–पूर्वेकडचे गाथ लोक.

**इथियोपी.**–(इथियोपिया). हा देश आफ्रिका खंडांत मिसर देशाच्या दक्षिणेस होता. हल्लीं त्यास न्यूबिया देश आणि आबिसिनिया ह्मणजे हेबस देश असें म्हणतात.

**इंदीज.**–(ईस्त). हिंदुस्तान, भागीरथीच्या पलीकडचें हिंदुस्तान आणि पूर्वेकडील आर्किपेलागोंतील बेटें ह्यांना हें नांव इंग्रजींत आहे. (वेस्त) उत्तरअमेरिकेंतील फ्लोरिदा द्वीपकल्प आणि दक्षिणअमेरिकेंतील ओरिनोको नदीचें मुख ह्यांच्यामध्यें हजारांच्या जवळ जवळ इतकीं बेटें आहेत. त्यांस हें नांव इंग्रजींत आहे.

**इब्री.**–(हीब्रू). यहुदी लोकांची भाषा.

**इसस.**–हें आशियामैनरच्या सिलिसी प्रांतांत गांव होतें. तेथें इ० स० पू० ३३३ व्या वर्षीं शिकंदर बादशाह आणि इराणचा राजा दारयावेश ह्यांची लढाई होऊन शिकंदरास जय मिळाला.

**इस्राइल.**–(इस्रलैत). यहुदी लोक.

**इस्राइल.**–१. हा इस्राइल लोकांचा मूळपुरुष होता. २. हें एक यहुदी लोकांचें राज्य होतें.

**ईजियन.**–ग्रीस देश आणि आशियामैनर ह्यांच्यामध्यें जो भूमध्यसमुद्राचा भाग आहे त्याचें प्राचीन नांव. हल्लीं त्याला आर्किपेलागो म्हणतात.

**ईस्तइंदीज.**–इंदीज शब्द पहा.

**एल्ब.**–ही नदी युरोपाच्या मध्यभागांतून वाहत जाऊन जर्मन समुद्रास मिळते.

**काप्ती.**–(काप्तिक). मिसरदेशच्या प्राचीन लोकांचे जे वंशज त्यांस काप्त म्हणतात आणि त्यांच्या भाषेस काप्ती म्हणतात.

**कापद्की.**–(कापादोसी). हा आशियामैनरांत पूर्वेकडे प्रांत होता.

**कार्थेज.**–हें मोठें प्रसिद्ध राजधानीचें शहर होतें. हें आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर हल्लींच्या त्यूनिस शहरापासून सुमारें १२ मैलांवर होतें. हें कधीं वसलें हें पक्कें समजत नाहीं; परंतु इ० स० पू० ८६९ च्या सुमारास फीनिकी लोकांनीं वसविलें असावेंसें दिसतें.

**केल्त.**–(केल्तिक). फ्रान्स देशांत रहाणाऱ्या लोकांस हें नांव होतें. जर्मनी आणि स्पेन ह्या देशांत रहाणाऱ्यांनाही केल्त म्हणतात. परंतु सेन नदी आणि गारोन नदी ह्यांच्यामधलि फ्रान्स देशाच्या भागांत रहाणाऱ्यांना विशेषेंकरून म्हणतात. ह्यांस गाल हेंही नांव होतें.

**क्यूमी.**–आशियामैनरांतील इयोली प्रांतांत हें गांव होतें.

**खलीपा.**–महमदाच्यामागून जे त्याच्या गादीवर बसले त्या सर्वांस हा किताब होता. ह्यांजकडे धर्मसंबंधी व राज्यसंबंधी असे दोन्ही अधिकार असत.

**खाल्दी.**–(खाल्दिआ) आशियांतील तुर्कस्तानांत युफ्रातिस व तैग्रिस ह्या नद्यांच्या मधला देश. ह्याचें मुख्य शहर बाबुलोन होतें.

**खोरेश.**–(सैरस). हा इराणचा राजा होता. ह्याच्या बापाचें नांव कांबुसस आणि आईचें नांव मंदानी. ही मेदी देशाचा राजा आस्त्रायजीज ह्याची कन्या होती.

**गाथ.**–स्वीदन आणि नार्वे एथील रहाणारे प्राचीन लोक.

**गाल.**–फ्रान्स देशाचें प्राचीन नांव. ह्यावरून तेथें रहाणाऱ्या लोकांसही गाल ह्मणत होते.

**गेदिज.**–हें बेट अतलान्तिक महासागरांत स्पेन देशाच्या किनाऱ्यावर होतें. ह्याला पूर्वी कोणी तार्तेसस म्हणत असत.

**ग्रानिकस.**–ही नदी आशियामैनर देशांत बिथिनी प्रांतांत आहे. एथें इ० स० पू० ३३४ ह्या वर्षी मासिदोनी लोकांचा राजा शिकंदर बादशाह आणि इराणी लोकांचा राजा दारयविश ह्यांची लढाई होऊन शिकंदराचा जय झाला. ह्या लढाईवरून ही नदी प्रसिद्ध आहे.

**जरतुष्ट.**–(जोरोआस्तर). हा पारशी लोकांचा धर्मप्रवर्तक होता. हा इराणच्या पूर्वेस बाक्त्री ह्मणून एक प्रांत होता तेथें राजा होता. ह्याचें नांव ऋग्वेदांत जरदष्टि असें आढळतें.

**जरतुष्टी.**–(जोरोआस्त्रियन). जरतुष्टाला अनुसरणारे ह्मणजे पारशी लोक.

**जिहून.**–(आक्सस). ही नदी स्वतंत्र तार्तरी देशांत बुदुकशान, बुखारा, खीवा वगैरे प्रांतांतून वहात पश्चिमेकडे उराल समुद्राला मिळते. हिला आमू असेंही नांव आहे.

**जन्द.**–इराणची प्राचीन भाषा.

**तार्तेसस.**–हें भूमध्य समुद्राच्या कांठीं हर्क्युलिसाच्या स्तंभाजवळ स्पेन देशांत गांव होतें. ह्याला पूर्वी गेदिज ह्मणत.

**तुराणी**-(तुरेनियन) इराण देशाच्या ईशान्य दिशेकडे कांहीं प्रांत आहेत, ते इराणच्या अमलाखालीं कधीं कधीं असत. त्यांस तुराण ह्मणतात, तेथील लोक.

**त्यूतन**.-(त्युतानिक). जर्मनी देशांत रहाणाऱ्या लोकांपैकीं हे लोक होते.

**थर्मापली**.-हा ग्रीस देशामध्यें थिसाली देशांतून लाक्रिस गांव आणि फोकिस प्रांत एथें जाण्याचा फार अरुंद मार्ग आहे. एथें इ० स० पू० ४८० व्या वर्षीं ग्रीक लोक व इराणी लोक ह्यांची लढाई होऊन इराणी लोकांचा पराजय झाला. ह्या लढाईवरून ही जागा फार प्रसिद्ध आहे.

**थीब्स**.-वरच्या आफ्रिकेंत ह्मणजे दक्षिण आफ्रिकेंत हें फरोहा प्रांताचें मुख्य शहर होतें.

**थ्रेस**.-हा देश युरोपांत स्कुथ देशाच्या दक्षिणेस हीमस पर्वतापर्यंत होता. ह्याच्या मर्यादा एणेंप्रमाणें. दक्षिणेस ईजियन समुद्र. पश्चिमेस मासादोन देश आणि स्त्रैमान नदी. पूर्वेस युक्झैन समुद्र आणि प्रापांतिस आणि हेलेस्पांत ह्या सामुद्रधुन्या.

**दच**.-हालंद देशांतले लोक.

**दन**.-देनमार्क देशांतले लोक.

**दोरी**.-ग्रीस देशांतल्या फोकिस, थिसाली, आणि आकार्नैनिया ह्या प्रांतांच्या मधल्या भागास दोरिस असें पूर्वीं ह्मणत. हल्लीं ग्रीस देशांत पुष्कळ जागांस हें नांव लागतें. ह्याव-रून ग्रीक लोकांना दोरी म्हणजे "दोरिस भागांतले" असें नांव पडलें आहे.

**निकोमेदी**.--आशियामैनरांतील बिथिनी प्रांताचें मुख्य शहर होतें. हल्लीं त्यास इजनिकमिद म्हणतात.

**निनवी**.--(निनवे). हें तुर्कस्तानांत तैग्रिस नदीच्या पूर्व किनाऱ्यावर शहर होतें. हल्लीं तेथें ननी म्हणून खेडें आहे.

**निमराद.**—असूर देशाच्या राज्याचा स्थापक.

**नेपल्स.**—हें ह्याच नांवाच्या राज्याचें मुख्य शहर भूमध्य समुद्राच्या किनाऱ्यास एका वांकणावर आहे. ह्याला नापोली असेंही म्हणतात.

**नबुखद्रेस्सर.**—( नेबुकद्रेजर ). हा बाबुलोनचा राजा होता.

**पर्सेपालिस.**—हें इराणच्या राजधानीचें शहर होतें. तें शिकंदर बादशाहानें दारयावेश राजा जिंकल्यावर धुळीस मिळविलें. हल्लीं त्यास एस्तकर किंवा तेहेलमिवर म्हणतात.

**पांतस.**—आशियामैनरांत ईशान्येकडचा एक प्रांत होता.

**पांपी.**—रोमन लोकांचा मोठा सरदार होता. हा जूलियस सीझरचा प्रतिस्पर्धी होता.

**पार्थी.**—१ ( पार्थिया ). आशिया खंडांत एक देश होता. त्याच्या मर्यादा एणेंप्रमाणें.—पश्चिमेस मेदी देश आणि दक्षिणेस कार्मेनी देश. उत्तरेस हर्कनी देश आणि पूर्वेस आर्य वगैरे देश.

२. पार्थी देशांतले लोक.

**पालिनीशिया.**—पासिफिकमहासागरांत मकरवृत्त आणि कर्कवृत्त ह्यांच्यामध्यें जे बेटांचे पुंजके आहेत त्यांस म्हणतात.

**पालिस्तैन.**—हा देश सूर देशाच्या दक्षिणेस भूमध्य समुद्राच्या किनाऱ्याच्या लगत्यास आहे. ख्रिस्ती लोकांचा प्रभु जो येशूख्रिस्त त्याचा जन्म ह्या देशांत झाला. म्हणून ह्याची त्या लोकांत फार मान्यता आहे. ह्या देशांत प्राचीन फीनिकी देश मोडत होता.

**प्लाती.**—ग्रीस देशांत बियोशिया प्रांतांत हें गांव होतें. एथें इ० स० पू० ४७९ व्या वर्षी ग्रीक आणि इराणी ह्या लोकांची लढाई होऊन ग्रीक लोकांचा जय झाला.

**पेलापोनीसस.**—ग्रीक देशाच्या अगदीं दक्षिण भागाच्या द्वीपकल्पास ह्मणतात. पीलाप्स म्हणून लोक एथें येऊन राहिले होते. त्यावरून हें नांव (म्हणजे पीलाप्स लोकांचें बेट) पडलें आहे. हल्लीं ह्याचें नांव मोरिया आहे. लातिन भाषेंत मोरस हें तुतीच्या झाडाचें नांव आहे. हीं झाडें एथें पुष्कळ आहेत म्हणून आतां मोरिया म्हणतात.

**फीनिकी.**—(फीनिश्या). हा देश आशिया खंडांत भूमध्य समुद्राच्या पूर्वेस होता. ह्याच्या मर्यादा निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या होत्या. फिनिक्स म्हणून एथला राजा होता त्यावरून हें नांव पडलें आहे.

**फ्रांक.**—युरोपाच्या पश्चिमभागीं रहाणारे जे लोक त्यास तुर्क, ग्रीक आणि अरब ह्या लोकांनीं दिलेलें नांव होतें.

**बाक्त्री.**—१ (बाक्त्रिया.) इराणच्या पूर्वभागास हा देश पूर्वी होता. जरतुष्ट एथला राजा होता.

२. ह्या देशांतले लोक.

**बाबुलोन.**—( बाबिलन ). हें असूर देशाच्या साम्राज्यांतील बाबुलोनी म्हणजे खाल्दी प्रांत ह्याचें मुख्य शहर युफ्रातिस नदीच्या कांठीं आहे. शिकंदर बादशाह एथें मरण पावला.

**ब्रितनी.**—हा फ्रान्स देशाचा एक प्रांत अतलांतिक महासागरांत पुढें आलेलें ह्या नांवाचें एक द्वीपकल्प होतें तेथें होता. ह्यास ब्रीतन असेंही म्हणतात.

**बैजंतियम.**—हें युरोपांत थ्रेस देशांत शहर होतें. ह्याला कान्स्तन्तैन बादशाहानें कान्स्तान्तिनोपल हें नांव दिलें होतें. हें पूर्वेकडील रोमच्या साम्राज्याचें मुख्य शहर होतें.

**मक्काबी.** – यहुदी लोकांचा एक भेद.

**मागी.**—पूर्वेकडील देशांत धर्मनिष्ठ लोक होते त्यांस ह्मणत. हे विशेषेंकरून इराणांत होते. ह्यांचा धर्मकृत्यांत व राज्य-

कारभारांतही हात असे. ह्यांचा मुख्य प्रवर्तक जर-तुष्ट होता.

**मायकेल.**—हें शहर आशियामैनरांत सामोस बेटासमोर होतें. एथें इ० स० पू० ४७९ व्या वर्षी ग्रीक आणि इराणी ह्या लोकांची लढाई होऊन ग्रीक लोकांचा जय झाला. हें शहर ह्या लढाईवरून प्रसिद्ध आहे.

**माराथन.**—हें खेडें आतिका प्रांतांत आथेन्स शहरापासून दहा मैलांवर होतें. एथें इ० स० पू० ४९० व्या वर्षी ग्रीक आणि इराणी ह्या लोकांची लढाई होऊन ग्रीक लोकांचें सैन्य थोडें होतें तरी त्यांनीं इराणी लोकांस जिंकिलें. ह्या लढाईवरून हें गांव प्रसिद्ध आहे.

**मासिदोन.**—हा थ्रेस, इपैरस, आणि ग्रीस ह्यांच्यामध्यें प्रांत होता.

**मेदी.**—१ ( मीदिया ). कास्पियन समुद्राच्या दक्षिणेकडचा इराणचा भाग. ह्याला पूर्वी आर्य असें ह्मणत. एथें कोणी मीदस ह्मणून एक राजा झाला होता त्यावरून हें नांव ह्या भागाला पडलें आहे. ह्याच्या मर्यादा एणेंप्रमाणें. उत्तरेस कास्पियन समुद्र, पश्चिमेस अर्मनी देश, दक्षिणेस इराणी देश आणि पूर्वेस पार्थी आणि हर्कानी हे देश. २. ह्या देशांतले लोक.

**मेरियस.**—रोमन लोकांचा एक मुख्य सरदार होता.

**मेरोविंजियन.**—मेरोवियस नामक मूळपुरुषावरून हें नांव फ्रेंच राजांच्या एका घराण्यास पडलें आहे. मेरोवियस हा इ० स० ५ व्या शतकांत झाला होता.

**मेसापोतामिया.**—युफ्रातिस आणि तैग्रिस ह्या नद्यांच्या मधला देश, मेसस ह्मणजे मध्य आणि पोतामस ह्मणजे

नदी ह्या दोन ग्रीक शब्दांवरून हें नांव झालें आहे. हल्लीं ह्याला दायरबकर असें ह्मणतात.

**मोंगोलिया.**—हा देश चिनईतार्तरीमध्यें मांचूरिया देशाच्या पश्चिमेस असून तिबेत व खास चीन ह्यांच्या उत्तरेस आणि सैबेरियाच्या दक्षिणेस आहे. हा उंचवटयाचा देश आशिया खंडाच्या मध्यभागीं आहे.

**यरूशालेम.**—(जरूजलेम). हें शहर पालिस्तैन देशांत आहे. यहुदी आणि ख्रिस्ती ह्या लोकांचा इतिहास झाला तो सर्व एथेंच झाला ह्यावरून हें शहर फार प्रसिद्ध आहे.

**यूक्झैन.**—काळ्या समुद्राचें प्राचीन नांव.

**रावेना.**—आद्रियातिक समुद्राच्या कांठीं इतालींतलें हें शहर होतें. हें इतालीचें कांहीं दिवस मुख्य शहर होतें. हें शहर दलदल जमिनीमध्यें आहे.

**लिगूरिया.**—इतालीमध्यें हा पश्चिमेस प्रांत होता.

**लिब्या.**—(लिबिया). हें आफ्रिकेंतल्या एका प्राचीन देशाचें नांव होतें. ह्याच्या मर्यादा.—पूर्वेस मिसर देश आणि पश्चिमेस हल्लीं म्हणतात तें त्रिपोलीचें राज्य.

**लुदीदेश.**—(लिदिया). हें आशियामिनरचें एक राज्य होतें. ह्याच्या मर्यादा निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या होत्या. ह्याला प्राचीन काळीं मिओनिया ह्मणत. पुढें लुदस म्हणून एथें एक राजा झाला होता, त्यावरून लुदी हें नांव पडलें आहे.

**लेबानोन.**-ही डोंगरांची ओळ पश्चिम आशिया खंडांत आहे. हिचा संबंध उत्तरेस आनातोलिया प्रांताशीं आहे. पुढें ही ओळ सूरदेश आणि पालिस्तैन देश ह्यांच्यामधून जाते.

**लेशियम.**-(लातियम). हा इताली देशांत तैबर नदीजवळ

समुद्रकिनाऱ्यावरचा प्रांत होता. एथील मूळच्या रहाणाऱ्या लोकांचा लातिनस म्हणून एक राजा होता, त्यावरून हें नांव ह्या प्रांताला पडलें आहे.

**वालाख्या**.–(वालाकिया). युरोपांतील तुर्कस्तानांत आग्नेयदिशेस हें संस्थान आहे.

**विसीगाथ**.–पश्चिमेकडचे गाथ लोक.

**वेस्तइंदीज**.–इंदीज शब्दाखालीं पहा.

**शमी**.–(सेमितिक). शम म्हणून नोआ ह्याचा मुलगा होता त्याचे वंशज. हे उत्तरेस भूमध्यसमुद्र आणि तैग्रिस नदी ह्यांच्यामध्यें आणि दक्षिणेस टौरस पर्वतापासून हिंदी महासागरापर्यंत रहात असत.

**शार्लमेन**.–हा फ्रांक लोकांचा राजा होता. हा पुढें रोमच्या पश्चिमेकडच्या राज्याचा बादशाह झाला. ह्याला चार्लस दि ग्रेत असेंही नांव होतें.

**सहराजन**.–(सारासीन). अरब लोक.

**साग्दियाना**.–स्वतंत्र तार्तरीमध्यें बुखाराच्या राज्यांतल्या कोहिक नदीच्या थडीला हें प्राचीन नांव होतें. एथील जमीन फार पिकाऊ आहे.

**सामनैत**.–हे इतालींतले रहाणारे लोक होते. ह्यांचें आणि रोमन लोकांचें फार वैमनस्य होतें.

**सालामिस**.–हें ग्रीक देशांतील आतिका प्रांताच्या दक्षिण किनाऱ्यावर बेट आहे. एथें इ० स० पू० ४८० व्या वर्षीं ग्रीक लोक आणि इराणी लोक ह्यांची लढाई होऊन ग्रीक लोकांचा जय झाला. हें बेट ह्या लढाईवरून फार प्रसिद्ध आहे.

**सिर्तिस**.–भूमध्यसमुद्रामध्यें दोन मोठ्या वाळूच्या ढिगांचें ना-

लेलें मोठें मैदान आहे तें. एक ढीग एपतिस शहराज-
वळ आहे आणि दुसरा कार्थेज शहराजवळ आहे.

**सिलिसी**.–( सिलिसिया ) आशियामैनरचा समुद्रकिनाऱ्यावरचा एक प्रांत होता. हा सैप्रसच्या उत्तरेस, टौरसच्या दक्षिणेस, आणि युफ्रातिसच्या पश्चिमेस होता.

**सिली बेटें**.–हीं इंग्लंदच्या पश्चिम भागाच्या अगदीं शेवटापासून सुमारें तीस मैलांवर आहेत.

**सिसाल्पैनगाल**.–हा फ्रान्स देशाचा भाग होता. ह्याचा विस्तार इतालीच्या बाजूनें आल्प्स पहाडापासून तों रूबिकन नदीपर्यंत होता. सिस म्हणजे ह्या बाजूस, आल्पैन म्हणजे आल्प्स पहाडाच्या आणि गाल म्हणजें फ्रान्स हे तीन लातिन शब्द मिळून हा एक शब्द झाला आहे. ह्याचा अर्थ आल्प्स पहाडाच्या ह्या बाजूचा (रोम शहराच्या बाजूचा) फ्रान्स देश असा होतो. "ह्या बाजूचा" हें रोम शहरच्या संबंधानें ह्मणणें आहे.

**सिहून**—( जाक्सार्तीस ) ही नदी स्वतंत्र तार्तरी देशांत कोकान प्रांताच्या सुमारें मध्यभागांतून वहात जाऊन उराल समुद्राला मिळते. हिला सिर किंवा सिरदर्या असेंही नांव आहे.

**सूरदेश**—आशियांतील तुर्कस्तानांत युफ्रातिस नदीच्या नैर्ऋत्य दिशेकडचा प्रांत.

**सेल्यूकस**.–सूरदेशचा राजा होता.

**सोफाला**.–पूर्वेकडील आफ्रिकेंतला पोर्तुगीज लोकांच्या अमलांतला प्रांत आहे.

**स्कांदिनेवी**.–(स्कांदिनेविया). नार्वे, स्वीदन, देन्मार्क, लापलंद, पोलंद, वगैरे जे हल्लींचे देश आहेत त्यांस हें प्राचीन नांव होतें.

**स्कुथी**.—( सिथियन ) युरोप आणि आशिया ह्या खंडांच्या अगदीं उत्तरेकडच्या देशास स्कुथ ( सिथिया ) ह्मणत, तेथले लोक ते स्कुथी. ह्या देशांत हल्लींचे तार्तरी, रूस, सैबेरिया, मस्कवी, क्रिमिया, पोलंद, नार्वे, स्वीदन, वगैरे देश मोडतात.

**स्पार्ता**.—हें पेलापोनीससमधील कोनी प्रांताचें मुख्य शहर होतें. हें युरोतस नदीच्या मुखापासून सुमारें तीस मैलांवर वसलें होतें.

**स्त्रैमान**.—ग्रीस देशांतील थ्रस आणि मासिदोन ह्या प्रांतांच्यामधली नदी. ही ईजियन समुद्राला मिळते.

**स्लावोनिया**.–आस्त्रिया देशांत हंगारी प्रांताचा एक भाग आहे. हा उत्तरेस आणि पूर्वेस द्रेव आणि दान्यूब ह्या नद्यांच्यामध्यें आहे. आणि ह्याच्या दक्षिणेस सेव नदी आहे, ती सर्विया आणि स्लावोनिया ह्यांच्यामध्यें आहे.

**स्लावोनी**.—( स्लावोनिक ). रूस देशांतल्या प्राचीन काळच्या लोकांस ह्मणतात.

**हालंद्र**.—दच लोक.

**हिस्पानिओला**.—हें बेट वेस्त इंदीजमध्यें आहे. ह्याला दुसरें नांव सान दोमिंगो आहे. हल्लीं ह्या बेटाला हायती हें नांव आहे.

**हेलेस्पांत**.–आशिया आणि युरोप ह्यांच्यामध्यें लहानशी सामुद्रधुनी आहे तिचें प्राचीन नांव. हल्लीं तिला दार्दनेल्स ह्मणतात.

---

## इंग्रजी मूळपुस्तकांतील विशेष नांवें ह्या पुस्तकांत मराठी रीतीप्रमाणें लिहिलीं आहेत तीं एणेंप्रमाणें:—

| ह्या पुस्तकांत. | इंग्रजींत. | ह्या पुस्तकांत. | इंग्रजींत. |
|---|---|---|---|
| अर्मनीदेश | आर्मेनीआ. | पार्थी. | पार्थ्यन्स. |
| अर्तहशस्ते. | आर्ताक्जर्क्सीज | फीनिकीदेश. | फीनिश्या. |
| असूर देश. | आसिऱ्या. | बाक्त्री. | बाक्ट्रिया. |
| आरामी. | आरामेईक. | बाबुलोन. | बाबिलन. |
| आर्य. | आर्यन. | बेलशस्सर. | बेलशाज्जर. |
| इब्री. | हीब्रू. | मिसर. | ईजिप्त. |
| इब्री भाषा. | हीब्रेइक. | मेदीदेश. | मेदिया. |
| कदर्लाओमर. | खेदोरलाअमर. | यहुदीदेश. | ज्युदिया. |
| काप्ती. | काप्तिक. | येहोयाकिम. | जेहोयाकिम. |
| कांबुसस | कामबैसीज. | योशीया. | जोसैआ. |
| खाल्दीदेश. | खालदिया. | लुदीदेश. | लिदिया. |
| खोरेश. | सैरस. | शमी. | सेमितिक. |
| जरतुष्ट. | जोरोआस्तर. | शलमोन. | सालोमन. |
| जरतुष्टीलोक. | जोरोआस्ट्यन्स. | शिकंदर. | आलेक्जांदर. |
| तुराणी. | तुरेन्यन. | सिदकिया. | जेदेकैआ. |
| तूर. | तैर. | सूरदेश. | सिरिया. |
| दार्यावेश. | दारैअस. | स्कुथी. | सिथ्यन्स. |
| नबूखद्रेस्सर. | नैबकद्रेज्जर. | | |

वगैरे.

**समाप्त.**

BOMBAY: PRINTED AT THE EDUCATION SOCIETY'S PRESS, BYCULLA.